**नोबल हॉस्पिटल अ‍ॅन्ड रिसर्च सेंटर, अहमदनगर या खाजगी रुग्णालयास वैद्यकीय खर्च प्रतिपुर्तीसाठी देण्यात आलेली शासन मान्यता रद्द करणेबाबत....**

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः मान्यता-२०१७/प्र.क्र.१७५/राकावि-२

गोकूळदास तेजपाल रुग्णालय आवार, बी विंग
मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
दिनांक : ०५ ऑक्टोबर, २०१८.

**वाचा -**

1. **शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.एमएजी-२००८/प्र.क्र.१८९/आरोग्य-५, दिनांक १६ सप्टेंबर, २००८.**
2. **सहसंचालक, आरोग्य सेवा, (रुग्णालये) राज्यस्तर, मुंबई यांचे पत्र क्र.संआसे/कक्ष-३/टे-११/राशाकर्मरुमा/नोबेलहॉस्पी/८०९२/१८, दिनांक २६ जुन, २०१८.**

**प्रस्तावना -**

महाराष्ट्र राज्य सेवा (वैद्यकीय देखभाल) नियम १९६१ व त्यानुषंगाने वेळोवेळी विहीत केलेल्या नियमांनुसार नोबल हॉस्पिटल अ‍ॅन्ड रिसर्च सेंटर, अहमदनगर या रुग्णालयास राज्य शासकीय कर्मचारी व त्यांच्या कुटुंबियांना हृदय विकार शस्त्रक्रिया, मेंदुवरील शस्त्रक्रिया व आर्थोपेडीक शस्त्रक्रिया तथा उपचार करण्यास व त्याप्रित्यर्थ होणाऱ्या वैद्यकीय खर्च प्रतिपुर्ती अनुज्ञेय ठरविण्यास दिनांक १६.०९.२००८ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली होती. सहसंचालक, आरोग्य सेवा, (रुग्णालये) राज्यस्तर, मुंबई यांनी त्यांच्या २६.०६.२०१८ च्या पत्रान्वये सदर रुग्णालय दिनांक ३१.०३.२०१६ पासून बंद असल्याचे कळविले असल्याने सदर रुग्णालयाची शासन मान्यता रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

महाराष्ट्र राज्य सेवा (वैद्यकीय देखभाल) नियम १९६१ व त्यानुषंगाने वेळोवेळी विहीत केलेल्या नियमांनुसार नोबल हॉस्पिटल अ‍ॅन्ड रिसर्च सेंटर, अहमदनगर या रुग्णालयास राज्य शासकीय कर्मचारी व त्यांच्या कुटुंबियांना हृदय विकार शस्त्रक्रिया, मेंदुवरील शस्त्रक्रिया व आर्थोपेडीक शस्त्रक्रिया तथा उपचार करण्यास व त्याप्रित्यर्थ होणाऱ्या वैद्यकीय खर्च प्रतिपुर्ती अनुज्ञेय ठरविणारा शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.एमएजी-२००८/प्र.क्र.१८९/आरोग्य-५, दिनांक १६.०९.२००८ हा शासन निर्णय पुर्वलक्षी प्रभावाने दिनांक ३१.०३.२०१६ पासून रद्द करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१००४१६१६४३७९१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhise Govind Changoji

Digitally signed by Bhise Govind Changoji
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e9596d652d5b6cb0f88e4c39c6c2adf97629debbf12176865f2683a6eb9318e8, cn=Bhise Govind Changoji
Date: 2018.10.05 11:03:49 +05'30'

**डॉ.गोविंद भिसे**

महाराष्ट्र शासनाचे कार्यासन अधिकारी

प्रत,

१) राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
४) अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव/ सचिव (सर्व मंत्रालयीन विभाग), मंत्रालय, मुंबई.
५) सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई .
६) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई .
७) विभागीय आयुक्त (सर्व)
८) पोलीस आयुक्त / पोलीस अधिक्षक (ग्रामीण) - (सर्व)
९) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१०) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा), मुंबई.
११) महालेखापाल, महाराष्ट्र-२(लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा परीक्षा), नागपूर.
१२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१३) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१४) संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
१५) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई.
१६) संचालक, आयुर्वेद, मुंबई.
१७) संचालक, राज्य कामगार विमा योजना, मुंबई.
१८) व्यवस्थापकीय संचालक, हाफकीन बायो-फार्मास्युटीकल कॉर्पोरेशन, परेल, मुंबई.
१९) महासंचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०) उपसंचालक, आरोग्य सेवा (सर्व)
२१) जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)

२२) जिल्हा शल्य चिकित्सक (सर्व)
२३) महाप्रबंधक, मुंबई उच्च न्यायालय, मुंबई.
२४) प्रोथोनोटरी व सिनियर मास्टर, उच्च न्यायालय, मुंबई.
२५) व्यवस्थापक, शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई.
२६) सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना), मंत्रालय, मुंबई यांना विनंती करण्यात येते की, त्यांनी सदर शासन निर्णय त्यांच्या अधिपत्याखालील सर्व विभागप्रमुख व कार्यालयप्रमुख यांच्या निदर्शनास आणून द्यावा.
२७) नोबल हॉस्पिटल ॲन्ड रिसर्च सेंटर, प्रेमदान चौक, अहमदनगर.
२८) निवड नस्ती (राकावि-२).